# महाराष्ट्र शासन

क्र. : मामात-२०२४/प्र.क्र.२५६(भाग-२)/जल-४
मृद व जलसंधारण विभाग,
मंत्रालय , मुंबई - ४०० ०३२.
दिनांक: ३० मार्च, २०२५.

**विषय:-** माजी मालगुजारी तलावांचे पुनरुज्जीवन व बळकटीकरण कार्यक्रमांतर्गत प्रशासकीय मान्यता प्राप्त कामांना निधी वितरित करणेबाबत.
(सन २०२४-२५) (विदर्भ विभाग)

**वाचा :** १) वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक अर्थसं-२०२४/प्र.क्र.८०/अर्थ-३, दिनांक २५ जुलै, २०२४, १२ फेब्रुवारी, २०२५ व १७ मार्च, २०२५.
२) शासन निर्णय क्र. संकिर्ण-२०२३/प्र.क्र.५१६/जल-१, दिनांक ११ ऑक्टोबर, २०२३.

**ज्ञापन :** माजी मालगुजारी तलावांच्या पुनरुज्जीवन व बळकटीकरणाचा कार्यक्रम मोहीम स्वरुपात राबविण्यासाठी संदर्भीय दिनांक ११/१०/२०२३ रोजीच्या शासन निर्णयान्वये सुधारित मार्गदर्शक सूचना निर्गमित करण्यात आल्या आहेत. त्यानुसार सदर कार्यक्रमांतर्गत विदर्भातील ०६ जिल्ह्यातील प्रशासकीय मान्यता प्राप्त १०७७ कामांसाठी वित्त विभागाच्या संदर्भीय परिपत्रकांनुसार सुधारित अंदाजाच्या मर्यादेत योजनेखाली (लेशिसंक्र ४७०२ ए०७३ याखाली) उपलब्ध करुन देण्यात आलेला एकूण रुपये २०.०० कोटी (अक्षरी रुपये वीस कोटी फक्त) एवढा निधी प्रशासकीय मान्यता किंमतीच्या समप्रमाणात "प्रपत्र-अ" प्रमाणे पुढील वितरणासाठी नागपूर व अमरावती प्रादेशिक कार्यालयास सुपूर्द करण्यात येत आहे.

२. उपरोक्त निधीच्या योग्य विनियोगासाठी खालील अटींची पूर्तता करण्यात यावी.

अ) प्रकल्पाच्या दुरुस्ती कामासाठी मंजूर असलेल्या किंमतीपेक्षा जास्तीची रक्कम अदा करण्यात येवू नये,

क) कोणत्याही कारणे निधी अखर्चित राहिल्यास, सदरची रक्कम परस्पर अन्य कामांसाठी वितरित न करता तातडीने शासनाकडे प्रत्यार्पित करावी,

ड) वित्त विभागाच्या संदर्भिय परिपत्रकांमधील मार्गदर्शक सूचनांचे काटेकोर पालन करावे.

ई) कोणत्याही कामास दुबार निधीचे वितरण होणार नाही, याबाबत दक्षता घेण्यात यावी.

३. याद्वारे वितरीत करण्यात आलेली रक्कम प्रादेशिक जलसंधारण अधिकारी, मृद व जलसंधारण विभाग, नागपुर व अमरावती यांनी आहरित करुन संबंधित जिल्हा जलसंधारण अधिका-यांकडे त्वरेने वितरित करावी.

४. त्यानुसार संबंधित जिल्हा जलसंधारण अधिका-यांनी सदर प्रशासकीय मान्यता प्राप्त कामांची निविदा कार्यवाही पुर्ण करुन कार्यारंभ आदेश देण्यासंदर्भात पुढील नियमोचित कार्यवाही करावी.

५. उपरोक्त निधी पुढील लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा आणि सन २०२४-२५ या आर्थिक वर्षाच्या मंजूर तरतूदीमधून भागविण्यात यावा.

मागणी क्र.झेडएच-५,
४७०२, लहान पाटबंधाऱ्यावरील भांडवली खर्च
००
१०१, भुपृष्ठ जल
(०२) परिरक्षण व दुरुस्ती
(०२) (०४) जुन्या मालगुजारी तलावांची पुनर्बांधणी व मजबुतीकरण (कार्यक्रम) (४७०२ए०७३)
५३, मोठी बांधकामे

५. याद्वारे, वितरीत निधीच्या खर्चाची उपयोगिता प्रमाणपत्रे महालेखाकार कार्यालयास सादर करुन त्याच्या प्रतीस्वाक्षरीत प्रती विहित मार्गाने शासनास सादर कराव्यात.

**६.** याद्वारे, वितरित निधीचा ताळमेळ ठेवण्याची जबाबदारी संबधित प्रादेशिक जलसंधारण अधिकारी, मृद व जलसंधारण विभाग कार्यालयाची राहिल व अप्पर आयुक्त जलसंधारण तथा मुख्य अभियंता, मृद व जलसंधारण, प्रादेशिक क्षेत्र, नागपूर हे सदर बाबींचे समन्वयक प्राधिकारी राहतील.

**७.** प्रस्तुत ज्ञापन, वित्त विभागाच्या संदर्भिय परिपत्रकान्वये प्रशासकिय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या शक्तींनुसार निर्गमित करण्यात येत असून, डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित केलेले हे ज्ञापन महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आहेत. त्यांचा संकेताक २०२५०३३०१६५२०४०९२६ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने.

RAJESH HEMCHAND BAGDE

Digitally signed by RAJESH HEMCHAND BAGDE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SOIL AND WATER CONSERVATION DEPARTMENT,
2.5.4.20=ed7af9a8be3d880eda8e29b769ac16864ea0732c103c7f011129ff654701c22c, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=B7A690C5B955786C61B12D2A97A09E71E030D081D0786B3D4740E1A0078F4684, cn=RAJESH HEMCHAND BAGDE
Date: 2025.03.30 16:54:23 +05'30'

**(रा.हे.बागडे)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) अप्पर आयुक्त जलसंधारण तथा मुख्य अभियंता, मृद व जलसंधारण, प्रादेशिक क्षेत्र, नागपूर.
२) प्रादेशिक जलसंधारण अधिकारी, मृद व जलसंधारण विभाग, नागपूर व अमरावती.
३) जिल्हा जलसंधारण अधिकारी (ल.पा.), जिल्हा परिषद, नागपूर, गोंदिया, भंडारा, चंद्रपूर, गडचिरोली व यवतमाळ

४) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)/(लेखा परीक्षा) महाराष्ट्र-२, नागपूर.
५) जिल्हा कोषागार अधिकारी (संबधित)
६) कक्ष अधिकारी, जल-११, मृद व जलसंधारण विभा, मंत्रालय, मुंबई.
७) निवड नस्ती / जल-४.

**प्रत अग्रेषित,**

१. मा. मंत्री (मृद व जलसंधारण) यांचे खाजगी सचिव.
२. मा. राज्यमंत्री (मृद व जलसंधारण) यांचे खाजगी सचिव.
३. मा. विरोधीपक्ष नेता (विधान परिषद) विधानमंडळ, मुंबई यांचे खाजगी सचिव.
४. स्थानिक लोकप्रतिनिधी (मार्फ़त संबधित ल.सिं.(जसं) उपविभागिय अभियंता).
५. सचिव, मृद व जलसंधारण विभाग, यांचे स्वीय सहायक.
६. आयुक्त, मृद व जलसंधारण विभाग, महाराष्ट्र राज्य, छ. संभाजीनगर.

शासन ज्ञापन क्र.मामात-२०२४/प्र.क्र.२५६(भाग-२)/जल-४,

दिनांक ३० मार्च,२०२५ सोबतचे निधी वितरणाचे

प्रपत्र “अ”

रुपये लाखात

| अ.क्र. | जिल्हा | प्रशासकीय मान्यता | | प्रस्तावित निधी वितरण (८.३७%) |
|---|---|---|---|---|
| | | कामांची संख्या | प्र.मा. किंमत | |
| १ | गोंदिया | ३६० | ४८२५.८४ | ४०३.४४ |
| २ | भंडारा | ९५ | २७०५.१० | २२६.१५ |
| ३ | चंद्रपुर | ४६० | १२०३२.९७ | १००४.९१ |
| ४ | गडचिरोली | १०७ | २९०५.१२ | २४२.८७ |
| ५ | यवतमाळ | २८ | ७९९.३४ | ६६.८२ |
| ६ | नागपूर | २७ | ६६७.६४ | ५५.८१ |
| **एकूण** | | **१०७७** | **२३९३६.०१** | २०००.०० |

RAJESH
HEMCHAND
BAGDE

Digitally signed by RAJESH HEMCHAND BAGDE
DN: CN = RAJESH HEMCHAND BAGDE, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = SOIL AND WATER CONSERVATION DEPARTMENT
Date: 2025.03.30 17:38:15 +05'30'